हसोळ लघु पाटबंधारे,प्रकल्प ता.लांजा, जि.रत्नागिरी,या योजनेस प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग,**

**शासन निर्णय क्र. लपायो -२०२०/(प्र. क्र.२०२/२०२०)/खारभूमी**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : ३१ मार्च, २०२२

**पहावे :-**

१) शासन निर्णय जलसंपदा विभाग, क्र. एएसजी/१०८२/३३२/(८२/८२)/जसंअ-२, दिनांक : १५/०७/१९८२

२) कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र क्र. कोंपाविम/तां.६/१६२८ दिनांक:०३/०६/२००४

३) कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र क्र. कोंपाविम/तां.२/ ओझर सुप्रमा/३१४२/२०१९ दिनांक:०७/१२/२०२०

४) वित्त विभागाचे क्र.व्यअस-२०२२/ प्र.क्र.३१ / अर्थ-२ दि.१० मार्च, २०२२ चे पत्र व सहपत्र

**प्रस्तावना:-**

हसोळ लघु पाटंबधारे योजनेअंतर्गत ता.लांजा, जि. रत्नागिरी येथे ५.५५७२ दलघमी क्षमतेचे स्थानिक नाल्यावर मातीचे धरण बांधण्यात आले आहे. हा प्रकल्प कोंकण पाटबंधारे विकास महामंडळाअंतर्गत " उर्वरित महाराष्ट्र " या प्रदेशामध्ये आहे. या प्रकल्पाद्वारे लांजा तालुक्यातील २ गावातील एकूण २५५ हे. क्षेत्रास उघडा कालवा व बंदिस्त नलिकेद्वारे सिंचनाचा लाभ देणे नियोजित आहे.

सदर योजनेस संदर्भाधिन क्र.२ येथील दि.०३/०६/२००४ च्या कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांच्या निर्णयान्वये प्रादेशिक दरसूची सन २००३-०४ नुसार रु. १५२९.४८ लक्ष रकमेस पुन: प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर प्रकल्पाच्या सन २०१७-१८ च्या दरसुचीवर आधारीत रु. ५३६९.७६७ लक्ष किंमतीच्या प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्तावाबाबत, राज्य तांत्रिक सल्लागार समिती.-२ (SLTAC-II) च्या दि. २७/१०/२०२० रोजी झालेल्या ४७ व्या बैठकीत छाननी अहवालातील १ ते २७ मुद्दे विचारात घेण्याच्या अधीन राहून, समितीकडून शिफारस करण्यात आली आहे. त्यानुषंगाने सदर्भ क्र.३ अन्वये कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांच्या कडून हसोळ लघू पाटबंधारे प्रकल्प, ता.लांजा,जि.रत्नागिरी या योजनेचा प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्ताव शासनास प्राप्त झाला आहे.

सदर प्रस्ताव व्यय अग्रक्रम समितीच्या दि.२४ फेब्रुवारी,२०२२ च्या बैठकीत विचारार्थ ठेवण्यात आला होता. व्यय अग्रक्रम समितीने सद्य:स्थिती, दरसूचीतील बदल, नवीन भूसंपादन कायदा, भूसंपादन खर्चात झालेली वाढ, संकल्पचित्रातील फेरबदल, गौण खनिज शुल्काच्या दरात झालेली सुधारणा इत्यादि किंमतवाढीची कारणमिमांसा यांचा सखोल परामर्श घेऊन हसोळ लघु पाटंबधारे प्रकल्प, ता.लांजा, जि. रत्नागिरी या प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची २०१७-१८ वर आधारित रु.५३६९.७६७ लक्ष किंमतीस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यास मान्यता दिली आहे. त्यास अनुसरून शासन पुढील आदेश निर्गमित करीत आहे.

**शासन निर्णय :-**

हसोळ लघु पाटंबधारे प्रकल्प, ता.लांजा, जि. रत्नागिरी या प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची २०१७-१८ वर आधारित रु. ५३६९.७६७ लक्ष( अक्षरी रुपये पाच हजार तीनशे एकोणसत्तर लक्ष शहात्तर हजार सातशे फक्त ) इतक्या किंमतीस [प्रत्यक्ष कामासाठी रु.४९०५.६१५ लक्ष व अनुषंगीक खर्च ४६४.१५२ लक्ष] खालील अटींच्या अधीन राहून प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. प्रकल्पाचा उपशिर्षनिहाय तरतूदींचा गोषवारा परिशिष्ट - "अ" मध्ये सोबत जोडला आहे.

१) सदर प्रकल्पाच्या प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्तावामध्ये अंतर्भुत किंमतीस तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घ्यावी.

२) " हसोळ लघु पाटंबधारे प्रकल्प, ता.लांजा, जि. रत्नागिरी " या प्रकल्पाची प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रीक बाबी निविदाविषयक क्षेत्रिय निर्णय, अनियमितता यास मान्यता गृहित धरली जाणार नाही. अशा प्रकरणाची तपासणी त्या वेळच्या प्रचलित शासन नियमानुसार करण्याची जबाबदारी क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

३) योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलीत शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा, विहित निविदा कार्यपध्दती अनुसरणे याची सर्वस्वी जबाबदारी संबंधीत क्षेत्रिय कार्यालयांची राहील.

४) राज्य तांत्रीक सल्लागार समितीने प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने दिलेल्या निर्देशांचे व त्रुटींची पुर्तता करणे याची सर्वस्वी जबाबदारी क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

५) प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे या प्रकल्पाबाबत सुरु असलेल्या अथवा भविष्यात उद्भवणाऱ्या विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहोचणार नाही, ती कार्यवाही तशीच चालू ठेवावी.

६) संपूर्ण प्रकल्प हा प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करावा.

या प्रकल्पाच्या कामावरील खर्च मागणी मुख्य लेखाशीर्ष "४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८००-इतर खर्च (१), सर्वसाधारण लघु पाटबंधारे योजना (१) " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या (कार्यासन १४३४) अनौपचारिक संदर्भ क्र.२०४/२०२१, दिनांक ०३/१२/२०२१ अन्वये तसेच वित्त विभागाच्या (कार्यासन व्यय-१२) अनौपचारिक संदर्भ क्र.४३२/२०२१, दिनांक २०/१२/२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार तसेच दिनांक २४/०२/२०२२ रोजी झालेल्या व्यय अग्रक्रम समितीच्या बैठकीमध्ये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता लपा कार्यासनाच्या प्रशासकीय मान्यता नोंदवहीत **३३१** या अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक **२०२२०३३११४३६०२५९२७** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUSHMA RAJEEV KUDAL

Digitally signed by SUSHMA RAJEEV KUDAL
DN: CN = SUSHMA RAJEEV KUDAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2022.03.31 14:38:53 +05'30'

**(सुषमा कुडल)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र :- परिशिष्ट "अ"**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, यांचे प्रधान सचिव मुंबई
३. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद/विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य,१/२ मुंबई / नागपूर.
६. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य,१/२ मुंबई / नागपूर.
७. वित्त विभाग (व्यय- १२), मंत्रालय, मुंबई -३२.
८. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई -३२.
९. जिल्हाधिकारी, रत्नागिरी
१०. कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
११. महासंचालक, संकल्पचित्र, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व धरण सुरक्षा, नाशिक.

१२. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई
१३. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. उप सचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१५. अधिक्षक अभियंता, उत्तर कोंकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, कळवा, ठाणे.
१६. अर्थ शाखा - १ व २, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१७. खारभूमी कार्यासन/ कार्यासन लपा, (संग्रहार्थ) ....

## परिशिष्ट-अ

(शासन निर्णय जलसंपदा विभाग क्र. लपायो -२०२०/(प्र. क्र.२०२/२०२०)/खारभूमी, दिनांक: ३१ मार्च ,२०२२ चे परिशिष्ट)

**हसोळ लघु पाटंबधारे . ता.लांजा, जि. रत्नागिरी प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता उपशिर्षनिहाय तरतूदी**

| अ.क्र. | उपशिर्ष | प्रथम सुप्रमानुसार तरतुद (दरसूची सन २०१७-१८) (रू. लक्ष) |
|---|---|---|
| **अ) शिर्ष कामे** | | |
| १. | अे - प्राथमिक | १४.०२० |
| २. | बी - भूसंपादन | २३९.७१२ |
| ३. | सी -मुख्य कामे | |
| | अ) मुख्य धरण | २८९६.८९ |
| | ब) सांडवा कामे | ४०८.६२१ |
| ४. | डी - विमोचक | ६१०.९०३ |
| ५. | के-इमारती | १७.१३९ |
| ६. | एम-वृक्षारोपण | ०.७५७ |
| ७. | ओ-संकीर्ण | ३३.७३३ |
| ८. | पी-देखभाल दुरुस्ती | ३९.६९५ |
| ९. | आर-रस्ते | ३५.९६३ |
| | **एकूण शिर्षकामे (अ)** | **४२९७.४३७** |
| **ब) कालवे व वितरण व्यवस्था** | | |
| १. | अे - प्राथमिक | १२.२६ |
| २. | बी - भूसंपादन | २४.३८ |
| ३. | एल मातीकाम/PDN | ५७१.५३८ |
| | **एकूण (ब)** | **६०८.१७८** |
| **क) आस्थापना व अनुषंगीक खर्च** | | **४६४.१५२** |
| **एकूण (अ+ब+क)** | | **५३६९.७६७** |

**योजनेची ठळक वैशिष्टे :-**

| | | |
|---|---|---|
| १ | हसोळ योजनेचे सिंचन क्षेत्र | २५५ हे. |
| २ | योजनेचा पाणीसाठा | ५.५५७२ द.ल.घ.मी |
| ३ | लाभव्यय गुणोत्तर | २.५७ (मापदंड १ पेक्षा अधिक मापदंडात बसते) |
| ४ | आर्थिक परतावा दर | २०.५०% ( मापदंड १२ % पेक्षा अधिक) योजना मापदंडात बसते |
| ५ | पाणीसाठा किंमत | रू. ९५.५५८/- प्रति सघमी प्रचलित मापदंड रू १,७६,७२० पेक्षा कमी) योजना मापदंडात बसते. |

SUSHMA RAJEEV KUDAL

Digitally signed by SUSHMA RAJEEV KUDAL
DN: CN = SUSHMA RAJEEV KUDAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2022.03.31 14:39:13 +05'30'

**(सुषमा कुडल)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**